**कृषि विद्यापीठांतर्गत राजर्षी छत्रपती शाहू महाराज शिक्षण शुल्क शिष्यवृत्ती योजना (ईबीसी) आणि डॉ. पंजाबराव देशमुख वसतीगृह निर्वाह भत्ता योजना या योजनांकरीता आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्याबाबत ...**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : मकृप १०१८/प्र.क्र.१६७/७-अे,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ११ जानेवारी, २०१९.

**वाचा :** १) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. कृषिवि-२००३/प्र.क्र.३५/२०-अे, दि.२५.४.२००३
२) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. कृषिवि-३७१५/प्र.क्र.१५५/८-अे, दि. १९.३.२०१६
३) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण २०१२/प्र.क्र.१६७/७-अे, दि. १६.३.२०१७
४) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र. संकिर्ण २०१७/प्र.क्र.३३२/तांशि-४, दि. ७.१०.२०१७
५) कृषि परिषद कार्यालयाचे पत्र जा.क्र. मकृप/शिक्षण-१/४३१७/२५०३/२०१८, दि. १७.११.२०१८

**प्रस्तावना :**

संदर्भ क्र. २, ३ व ४ येथील शासन निर्णयान्वये, राज्यातील कृषि विद्यापीठांतर्गत कृषि व संलग्न विषयांच्या अभ्यासक्रमांच्या खाजगी कायम विनाअनुदानित महाविद्यालयांमध्ये प्रवेश घेतलेल्या आर्थिकदृष्टया मागास विद्यार्थ्यांसाठी शिक्षण शुल्क प्रतिपूर्ती योजना शैक्षणिक वर्ष २०१५-१६ पासून पुढे चालू ठेवण्यास मान्यता देण्यात आली आहे.

२. राज्य शासनाकडून विद्यार्थ्यांना देण्यात येत असलेल्या विविध शिष्यवृत्ती/प्रतीपूर्ती योजनेचा लाभ मिळण्यासाठी राज्य शासनाने महाडीबीटी पोर्टल सुरु केलेले आहे. सदर पोर्टलद्वारे राज्यातील कृषि विद्यापीठांतर्गत प्रवेश घेतलेल्या आर्थिकदृष्टया मागास विद्यार्थ्यांच्या शैक्षणिक शुल्काची प्रतिपूर्ती/ शिष्यवृत्ती/विद्यावेतन अदा करण्यासाठी राज्यातील चारही कृषि विद्यापीठांसाठी केंद्रिय आहरण व संवितरण अधिकारी नियुक्त करणे आवश्यक आहे. यास्तव राजर्षी छत्रपती शाहू महाराज शिक्षण शुल्क शिष्यवृत्ती योजना (ईबीसी) आणि डॉ. पंजाबराव देशमुख वसतीगृह निर्वाह भत्ता योजनांचे लाभ, इ. महाडिबीटीद्वारे विद्यार्थ्यांना अदा करण्यासाठी महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे कार्यालयातील वित्तीय सल्लागार यांना केंद्रिय आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

राज्यातील चारही कृषि विद्यापीठांतर्गत उक्त नमूद शासन निर्णयामधील कृषि व संलग्न अभ्यासक्रमांसाठी शिक्षण घेत असलेल्या विद्यार्थ्यांना, राजर्षी छत्रपती शाहू महाराज शिक्षण शुल्क शिष्यवृत्ती योजना (ईबीसी) आणि डॉ. पंजाबराव देशमुख वसतीगृह निर्वाह भत्ता योजना या योजनांचे लाभ देण्याकरीता

"वित्तीय सल्लागार, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे" यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

२. याप्रकरणी संबंधित आहरण व संवितरण अधिकारी यांनी शासनाचे प्रचलित आदेश/कार्यपध्दती, महाराष्ट्र कृषि विद्यापीठे अधिनियम १९८३, महाराष्ट्र कृषि विद्यापीठ परिनियम १९९० आणि महाराष्ट्र कृषि विद्यापीठ लेखासंहिता १९९१, मधील तरतुदीनुसार आवश्यक कार्यवाही करावी.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्या विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक ४४३/ १८/ को.प्र.५, दि. २१.१२.२०१८ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०११११५३६४५४७०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Gite Pratap Venkatrao

Digitally signed by Gite Pratap Venkatrao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and Animal Husbandry, Dairying and Fisheries Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fa90705dc27d17e7f5a948e535706ff2c3a1f6c3212fbe679cdac2da9677bb72, serialNumber=707437d6d784d92730d943579bec96a06c8b9d1b0f545fe42541583be9e598cd, cn=Gite Pratap Venkatrao
Date: 2019.01.11 15:46:06 +05'30'

**( प्रताप गिते )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति:**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
३) मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
४) मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
५) मा. मुख्य सचिव, यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
६) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई,
७) प्रधान सचिव (माहिती व तंत्रज्ञान) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई,
८) सचिव (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय मुंबई
९) प्रधान सचिव (पदुम) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय मुंबई
१०) सचिव, सामाजिक न्याय विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई,
११) सचिव, आदिवासी विकास विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई,
१२) आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे
१३) सदस्य सचिव तथा महासंचालक, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, १३२/ब, भांबुर्डा, भोसलेनगर, पुणे-७.
१४) कुलगुरु/कुलसचिव/नियंत्रक, महात्मा फुले कृषि विद्यापीठ,राहुरी.
१५) कुलगुरु/कुलसचिव/नियंत्रक, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ,अकोला.
१६) कुलगुरु/कुलसचिव/नियंत्रक, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी.
१७) कुलगुरु/कुलसचिव/नियंत्रक, डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ,दापोली.
१८) महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखापरिक्षा /लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर
१९) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२०) निवासी लेखापरिक्षा अधिकारी
२१) कृषि व पदुम विभाग (का.६अे म्हापसू)
२२) निवडनस्ती.